**अनुसचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या महसूली क्षेत्रिय आस्थापनेवरील गट- “क” संवर्गातील कर्मचारी यांच्याकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- ईएसटी-२०२४/प्र.क्र.१३/ ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ मे, २०२४.

**संदर्भ**:- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९ .
२.जिल्हाधिकारी, नाशिक यांचे पत्र क्र.आस्थाप/मावक/कावि/२०२१/१/९/१६२ दि. २९/१०/२०२२ रोजीची पत्रे.
३.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/ १६- ब, दिनांक ३०/६/२०२०
४. महसूल व वन विभाग, कार्या.ई-१० यांची टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर ) व इतर याचिका यामध्ये दि. ६/७/२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी, रिट याचिका क्र.३१४०/२००८ मध्ये दि.२८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१/१२/२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्या पदावर अधिकारी / कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्यची सूचना दिली आहे. त्यास अनुसरुन जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या अधिनस्थ कार्यालयातील आस्थापनेवर श्री. ए.जे.बावस्कर (तलाठी) महसूली क्षेत्रिय संवर्गातील अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

श्री. ए.जे.बावस्कर (तलाठी) यांचे अनुसूचित जमाती तपासणी समिती,अमरावती यांनी रद्द केल्याने त्यांच्या सेवा वर्ग करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.१ अनुसार महसूली संवर्गातील गट “क” संवर्गातील श्री. ए.जे.बावस्कर (तलाठी) यांच्याकरीता अधिसंख्य पद जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे. **सदर पदाचा तपशील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमुद केला आहे.**

२. सदर अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे आधी घडेल त्या दिनांकापर्यंत सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

३. श्री. ए.जे.बावस्कर (तलाठी) यांचे अधिसंख्य पद जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

४. सदर पदाच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या महसूली विभागात कार्यरत आहेत त्या विभागाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९ मधील तरतुदीनुसार व सा.प्र.वि.च्या क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३०/६/२०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०५०९१६४५०७०९१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIRAM DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.05.09 16:58:59 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
२) जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक
३) तहसिलदार, निफाड
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र -२, मुंबई.
५) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
६) सामान्य प्रशासन विभाग, ( कार्यासन-१६-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
७) महसूल व वन विभाग, कार्यासन ई-७ /ई-१०, मंत्रालय,मुंबई - ३२.
८) निवड नस्ती.

शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२४/प्र.क्र.१३/ई-८ सोबतचे विवरणपत्र

महसूली क्षेत्रिय संवर्गातील जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या अधिनस्थ कार्यालयातील आस्थापनेवरील यापुर्वी सेवासमाप्त करण्यात आलेल्या गट क मधील निम्नलिखित कर्मचाऱ्याकरिता निर्माण करण्यात येणारे अधिसंख्य पद

| अ क्र | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नांव | संबधित कर्मचाऱ्याकरिता निर्माण करण्यात येणाऱ्या अधिसंख्य पदाचे पदनाम | गट | मुळ नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्त करण्यात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. ए.जे.बावस्कर (तलाठी) | तलाठी | गट-क | दि.३०/०६/१९९९ | दि.३१/१२/२०२१ |